नागपूर जिल्ह्यातील राज्य मार्ग क्र.२९३ ची कळमेश्वर नगरपरिषद हद्दीतील रस्ते लांबी अवर्गीकृत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१३/प्र.क्र.३/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २७ मार्च, २०१५.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.का.प्रआ/ रस्तेहस्तांतरण/४३५७, दिनांक१९/०९/२०१३.

२) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.का./ प्रआ३५०८, दिनांक २८/०८/२०१४.

३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.कार्या-प्रआ रस्ता हस्तांतरण /८७१, दिनांक १८/०२/२०१५.

४) शासन निर्णय क्र.आरबीडी-१०८१/८७१/रस्ते-७, दिनांक ९/३/२००१.

प्रस्तावना :-

नागपूर जिल्ह्यातील कळमेश्वर शहरामधून जाणा-या राज्य मार्ग क्र.२९३ ला बाह्यवळण रस्ता तयार करण्यात आला आहे. नागपूरकडून काटोलकडे जाणारी वाहतुक सदर बाह्यवळण रस्त्यावरुन सुरळीतपणे होत असल्याने, सदर रस्त्याची कळमेश्वर नगरपरिषद हद्दीतील लांबी अवर्गीकृत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. उपाध्यक्ष, नगरपरिषद कळमेश्वर यांनी राज्य मार्ग क्र.२९३ ला बाह्यवळण मार्ग काढण्यात आला असल्यामुळे, कळमेश्वर नगरपरिषद हद्दीतील सदर रस्त्याची लांबी अवर्गीकृत करण्याबाबत विनंती केली आहे. तसेच सदर रस्त्याच्या देखभाल -दुरुस्तीचा खर्च कळमेश्वर नगरपरिषदेकडून करण्यात येईल असा ठराव क्र.१८, दिनांक २९/११/२०१३ रोजी पारित करण्यात आला आहे.

शासन निर्णय :-

मुख्य अभियता, सा.बां.प्रा.विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव व त्याअनुषंगाने प्राप्त झालेला अहवाल, स्थानिक लोकप्रतिनिधीची विनंती तसेच संदर्भाधीन शासन निर्णयातील टिप ५ मधील तरतूद विचारात घेऊन, नागपूर जिल्ह्यातील कळमेश्वर नगरपरिषद हद्दीतील रा.मा.क्र.२९३ ची सा.क्र.१८/०० ते २१/३०० (३/३०० कि.मी.) लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहे. त्यापुढील ब्राम्हणी ग्रामपंचायत हद्दीतील सा.क्र.२१/३०० ते २२/५०० ही लांबी राष्ट्रीय महामार्ग क्र.५४७ ई मध्ये समाविष्ट होणार असून, सा.क्र.२२/५०० ते २४/६०० ही लांबी कळमेश्वर-मोहपा-तेलगांव-नांदा या राज्य मार्ग क्र.३४९ ची वाढीव

लांबी समजण्यात यावी. परिणामी राज्य मार्ग क्र.३४९ चा आरंभबिंदू रा.मा.२९३ च्या सा.क्र.२४/६०० पासून सुरु होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२७१८११००६७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjeev Anant Rane

Digitally signed by Sanjeev Anant Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjeev Anant Rane
Date: 2015.03.27 18:21:13 +05'30'

**( संजीव राणे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२) मुख्य अभियंता, (मग्रारविसं), मंत्रालय, मुंबई.

३) विभागीय आयुक्त, नागपूर.

४) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नागपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

५) जिल्हाधिकारी, नागपूर.

६) मुख्याधिकारी, नगरपरिषद कळमेश्वर.

७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.

८) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, नागपूर.

९) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

१०) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

११) निवडनस्ती.